व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहूल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुसरी/तिसरी पाळी व बृहन्मुंबईत २ नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी व नेहरुनगर (कुर्ला) या संस्थांमधील अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि. ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२३/प्र.क्र.१३८/व्यशि-१ (भाग-२),**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२४.

**वाचा :-** (१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. टीईपी-२००२/प्र.क्र. १३/सेवा-३, दि. २१/०६/२००६
(२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२००९/(१२/०९)/व्यशि-३, दि. २९/०८/२००९
(३) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. व्यशिअ-२०२०/प्र.क्र.१०२/व्यशि-1 दि. ०७/०४/२०२२.
(४) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२२/प्र.क्र.१९९/व्यशि-१, दि. २४/११/२०२२
(५) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२२/प्र.क्र.१९९(१)/व्यशि-१, दि. २४/११/२०२२
(६) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.मुवाढ-२०२२/प्र.क्र.१९९/व्यशि-१, दि. १२/०४/२०२३
(७) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२२/प्र.क्र.१९९/व्यशि-१, दि. १८/०७/२०२३
(८) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२२/प्र.क्र.१३८/व्यशि-१ (भाग-२), दि. १८/०७/२०२३
(९) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२३/प्र.क्र. १३८/व्यशि-१ (भाग-२), दि. ११/१०/२०२३
(१०) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र. क्र. ८/१६/आ.पु.क., दि. २१/०२/२०२४
(११) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. व्यशिप्र- २०२३/आस्था-३/मुदतवाढ/प्र.क्र.७/का.४, दि. १२/०१/२०२४

**प्रस्तावना** :-

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेऊन मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर सुधारीत आकृतीबंधामध्ये संदर्भ क्र. (२) अन्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखालील राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहूल

भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुसरी/तिसरी व बृहन्मुंबईत २ नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी व नेहरुनगर (कुर्ला) या संस्थांकरीता योजनांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या ४१७ अस्थायी पदांपैकी ३५ पदे निरसित करुन तसेच २ पदे संस्थेच्या दर्जानुसार वाढवून एकूण ३८४ पदांना मंजुरी देण्यात आली आहे.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील मंजूर एकूण १५४८९ पदांपैकी ८५२३ पदे संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये स्थायी पदांमध्ये रुपांतरीत करण्यात आली होती. तद्नंतर या विभागाच्या विभागाच्या संदर्भ क्र. (८) येथील शासन निर्णयान्वये विभागाचे संदर्भ क्र. (४) व (६) अधिक्रमित करुन वित्त विभागाच्या दि. २१/०६/२००६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारीत आकृतीबंधानुसार एकूण १५४८९ मंजूर पदांपैकी ८५२१ पदांचे स्थायी पदांमध्ये रुपांतर करण्यात आले आहे. या विभागाच्या संदर्भ क्र. (९) येथील शासन निर्णयान्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहूल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुसरी/तिसरी व बृहन्मुंबईत २ नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी व नेहरुनगर (कुर्ला) या संस्थामधील ३८४ अस्थायी पदांना दि. ०१/०९/२०२३ ते दि. २९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१०) येथील शासन निर्णयान्वये दि. ०१/०३/२०२४ ते दि. ३१/०८/२०२४ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्या अनुषंगाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने संदर्भ क्र. (११) येथील पत्रान्वये सदर पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यास अनुसरुन सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय** :-

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहूल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुसरी/तिसरी पाळी व बृहन्मुंबईत २ नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी व नेहरुनगर (कुर्ला) या संस्थामधील ३८४ अस्थायी पदांना (सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ येथील) दिनांक ०१/०३/२०२४ पासून दिनांक ३१/०८/२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटी व शर्तीस अधिन राहून मंजुरी देण्यांत येत आहे:-

**अटी व शर्ती :-**

(१) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करण्यांत आली, त्याच प्रयोजनासाठी पुढे चालू ठेवण्यात यावीत. चालू ठेवण्यात आलेल्या अस्थायी पदांवरील कर्मचारी नियमानुसार मिळणारे वेतन भत्ते इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावेत.

(२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही याची खात्री करून घेण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खालील लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

> "अल्पसंख्यांक विकास विभाग- मागणी क्र. झेडई-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (००)(१६)- अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहायक अनुदान (२२३५ ए ५३४)"

उपरोक्त लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय अंदाज, सुधारित अंदाज तसेच अंतिम सुधारित अनुदानाचे प्रस्ताव विहित वेळेत सादर करण्याची दक्षता संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. २१/०२/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२०१५२३३७२१०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2024.03.20 15:33:16 +05'30'

**( प्रदीप शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय)
२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सर्व संबंधित सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालनालयामार्फत).
९. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-२)/(प्रशा२), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उप सचिव (कार्या-८), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती (व्यशि-१)

(कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२३/प्र.क्र.१३८/व्यशि-१ (भाग-२), दि. २०/०३/२०२४ सोबतचे प्रपत्र-अ)

| प्रपत्र - अ<br>राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत दुसरी/तिसरी पाळी व बृहन्मुंबईत २ नवीन औ. प्र. संस्था, मांडवी व नेहरूनगर (कुर्ला) सुरू करण्याकरिता मंजूर करण्यात आलेली योजनांतर्गत ३८४ अस्थायी पदे | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | पदनाम | ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | | पदांची संख्या |
| | **गट-अ** | - | - | - |
| १ | प्राचार्य | एस-२३ | रु. ६७७००-२०८७०० | २ |
| | **एकूण गट-अ** | | | **२** |
| | **गट-अ (क)** | | | - |
| २ | प्राचार्य | एस-२० | रु. ५६१००-१७७५००/- | ३ |
| | **एकूण गट-अ (क)** | | | **३** |
| | **गट-ब** | | | |
| ३ | प्राचार्य | एस-१७ | रु. ४७६००-१५१११०/- | १ |
| | **एकूण गट-ब** | | | **१** |
| | **गट-क** | - | - | - |
| ४ | गट निदेशक | एस-१५/ एस-१७ | एस -१५: रु. ४१८००-१३२३००/-<br>एस-१७: ४७६००-१५१०० (वरिष्ठश्रेणी) | २० |
| ५ | शिल्प निदेशक | एस-१४<br>एस-१५<br>एस-१७ | एस-१४: रु. ३८६००-१२२८००/<br>एस-१५: ४१८००-१३२३०० (वरिष्ठ श्रेणी)<br>एस-१७: ४७६००-१५११०० (निवड श्रेणी २०% पदांकरीता ) | २७६ |
| ६ | गणित तथा चित्रकला निदेशक | एस-१४<br>एस-१५<br>एस-१७ | एस-१४: रु. ३८६००-१२२८००/<br>एस-१५: ४१८००-१३२३०० (वरिष्ठ श्रेणी)<br>एस-१७: ४७६००-१५११०० (निवड श्रेणी २०% पदांकरीता ) | २० |
| ७ | मुख्य लिपिक | एस-१३ | रु. ३५४००-११२४००/- | १ |
| ८ | भांडारपाल | एस-१० | रु. ३८६००-१२२८००/- | १ |
| ९ | वरिष्ठ लिपिक | एस-८ | रु. २५५००-८११००/- | ४ |
| १० | लिपिक-नि-टंकलेखक | एस-६ | रु. १९९००-६३२००/- | ४८ |
| ११ | सहाय्यक भांडारपाल | एस-६ | रु.१९९००-६३२००/- | १ |
| | **एकूण (गट-क)** | | | **३७१** |
| | **गट-ड** | - | | - |
| १३ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | एस-१ | रु. १५०००-४७६००/- | ७ |
| | **एकूण (गट-ड)** | | | **७** |
| | **एकूण** | | | **३८४** |